**अर्थसंकल्पिय अनुदान सन २०१४-२०१५**
"२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-०१ पाणीपुरवठा-००१, संचालन व प्रशासन (०१) (०१) पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उपविभागीय आस्थापना (२२१५ १८४३), दत्तमत"

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/प्र.क्र.८५/पापु-२३
## मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: २० सप्टेंबर, २०१४

**वाचा**

1. **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अंदाज-१०१४/प्र.क्र.११०/अर्थसंकल्प-३ दिनांक १ जुलै,२०१४**
2. **शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१४/प्र.क्र.८५/पापु-२३, दिनांक ५ मे, २०१४**

**प्रस्तावना**

सन २०१४-२०१५ या अर्थसंकल्पासाठी महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१४ (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम, २०१४ यांच्या अनुसूचीच्या स्तंभ-४ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या रकमांसह) यांस विधानमंडळाने मंजूरी दिलेली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली असल्याचे उपरोक्त वित्त विभागाच्या परिपत्रकान्वये कळविलेले आहे.

२. जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील अधिकारी /कर्मचारी वर्ग-१ व वर्ग-२ यांचे वेतन व इतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२"२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-०१ पाणीपुरवठा-००१, संचालन व प्रशासन (०१) (०१) पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय/उपविभागीय आस्थापना (२२१५ १८४३) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी एकूण रुपये २४,५८,७४,०००/- (अक्षरी रुपये चौवीस कोटी,अठावन्न लक्ष, चौ-याहत्तर हजार फक्त) इतकी तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी ०१ वेतनासाठी रुपये २३,७६,९८,०००/- (अक्षरी रुपये तेवीस कोटी, शहात्तर लक्ष, अठयान्नव हजार फक्त) व ११ देशांतर्गत प्रवास खर्चासाठी रुपये ८१,७६,०००/- (अक्षरी रुपये ऐक्याऐंशी लक्ष, शहात्तर हजार फक्त) इतकी तरतूद करण्यात आली आहे.

३. वरील प्रमाणे उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानापैकी, माहे एप्रिल ते जुलै २०१४ या चार महिन्यासाठी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये ०१ वेतन या उपशिर्षाखाली रुपये ७,९३,५२,०००/- इतकी रक्कम वितरीत करण्यात आली आहे.

४. आता, वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकानुसार दिनांक १/८/२०१४ ते ३०/११/२०१४ या कालावधीतील आस्थापनाविषयक खर्च भागविण्यासाठी "२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-०१ २२१५ १८४३" या लेखाशीर्षाखाली ०१ वेतनासाठी रुपये ६,३२,६६,०००/- (अक्षरी रुपये सहा कोटी बत्तीस लक्ष सहासष्ट हजार फक्त) इतके अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले आहे. मंजूर झालेले अनुदान संबंधीत कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, सर्व जिल्हा परिषद यांना उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन आहे.

## शासन निर्णय

सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षाकरिता "२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता-०१ पाणीपुरवठा-००१,संचालन व प्रशासन(०१)(०१)पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय/उपविभागीय आस्थापना (२२१५ १८४३) (दत्तमत)", ०१ वेतन खर्चासाठी (मागणी क्र.वाय-२)" या लेखाशिर्षाखाली रुपये २४,५८,७४,०००/- (अक्षरी रुपये चोवीस कोटी, अठठावन्न लक्ष, चैा-याहत्तर हजार) इतक्या रक्कमेची तरतूद करण्यात आलेली आहे.

२. महाराष्ट्र राज्यातील जिल्हा परिषदांतील ग्रामीण पाणी पुरवठा विभागातील व उपविभागातील अधिकारी व कर्मचारी यांच्या वेतनावरील खर्च भागाविण्यासाठी लेखाशिर्ष २२१५ १८४३, ०१ वेतन या उपलेखाशिर्षाखाली सोबतच्या विवरणपत्र-अ मधील स्तंभ-३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे रुपये ६,३२,६६,०००/- (सहा कोटी, बत्तीस लक्ष, सहासष्ट हजार फक्त) इतकी रक्कम संबधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद सर्व यांना मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहिल. या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र- अ मध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही, याची दक्षता सर्व संबधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी घ्यावी. सदर खर्च संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या मासिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९२०१११५३६३२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.09.23 12:00:43 +05'30'

**महेश भ. सावंत**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त सर्व
२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
४. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे.
५. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
६. प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
७. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता,
८. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
९. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१०.महालेखापाल, महाराष्ट्र - १ मुंबई (लेखा परिक्षा( (५ प्रतीस)
११.महालेखापाल, महाराष्ट्र - १ मुंबई (लेखा अनुज्ञेयता((५ प्रतीसह)
१२.महालेखापाल, महाराष्ट्र - २ नागपूर (लेखा परिक्षा( (५ प्रतीसह)
१३.महालेखापाल, महाराष्ट्र - २ नागपूर (लेखा अनुज्ञेयता( (५ प्रतीसह)
१४.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५.उप अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१६.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१७.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नाशिक, पुणे,औरंगाबाद, अमरावती व नागपूर
१८.वित्त विभाग (व्यय-३ व अर्थ-१९)
१९. कार्यासन क्रमांक पापु-०४ व २०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
२०. ग्राम विकास व जलसंधारण विभागा (५प्रती)
२१.निवड नस्ती कार्यासन क्र.२३

## विवरणपत्र-अ

शासन निर्णय पा.पु.व स्व.वि.क्रं.बजेट-२०१४/ प्र.क्र.८६/पापु-२३, दिनांक २० सप्टेंबर २०१४ चे सहपत्र

लेखाशिर्ष - २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता ०१, पाणी पुरवठा, ००१, संचालन व प्रशासन (०१) (०१) पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय/उपविभागीय आस्थापना (२२१५ १८४३) ०१ (वेतन),११ प्रवासखर्च

रुपये हजारात

| अ. क्र | जिल्हयाचे नांव | सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षामध्ये १ऑगस्ट ,२०१४ ते ३० नोव्हेंबर,२०१४ या कालावधीसाठी मुक्त करण्यात आलेले अनुदान. | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | उपलेखाशीर्ष ०१ वेतन | उपलेखाशीर्ष ११ प्रवास खर्च | लेखाशीर्ष २२१५ १८४३ खाली वितरीत करण्यात येत असलेली रक्कम एकूण अनुकमांक (३+४) | लेखाशीर्ष २२१५ १८४३ खाली वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (अक्षरी रुपये) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ठाणे | ४६७८.३०० | ० | ४६७८.३०० | (अक्षरी रुपये सेहेचाळीस लक्ष अठठयाहत्तर हजार तीनशे फक्त) |
| २ | रायगड | १९९४ ९०० | ० | १९९४.९०० | (अक्षरी रुपये एकोणीस लक्ष चैा-याण्णव हजार नऊशे फक्त) |
| ३ | रत्नागिरी | २०२७.८०० | ० | २०२७.८०० | (अक्षरी रुपये वीस लक्ष सत्तावीस हजार आठशे फक्त) |
| ४ | सिंधुदुर्ग | १७६१.६०० | ० | १७६१.६०० | (अक्षरी रुपये सतरा लक्ष एकसष्ट हजार सहाशे फक्त) |
| ५ | नाशिक | २२०५.२०० | ० | २२०५.२०० | (अक्षरी रुपये बावीस लक्ष पाच हजार दोनशे फक्त) |
| ६ | धुळे | १००७.५०० | ० | १००७.५०० | (अक्षरी रुपये दहा लक्ष सात हजार पाचशे फक्त) |
| ७ | नंदुरबार | ८७४.४०० | ० | ८७४.४०० | (अक्षरी रुपये आठ लक्ष चैा-याहत्तर हजार चारशे फक्त) |
| ८ | जळगांव | १०५३२.००० | ० | १०५३२.००० | (अक्षरी रुपये एक कोटी पाच लक्ष बत्तीस हजार फक्त) |
| ९ | अहमदनगर | २६४८.८०० | ० | २६४८.८०० | (अक्षरी रुपये सव्वीस लक्ष अठठेचाळीस हजार आठशे फक्त) |
| १० | पुणे | २६४८.८०० | ० | २६४८.८०० | (अक्षरी रुपये सव्वीस लक्ष अठठेचाळीस हजार आठशे फक्त) |
| ११ | सातारा | १९८७.८०० | ० | १९८७.८०० | (अक्षरी रुपये एकोणीस लक्ष सत्याऐंशी हजार आठशे फक्त) |
| १२ | सांगली | ६९७.००० | ० | ६९७.००० | (अक्षरी रुपये सहा लक्ष सत्याण्णव हजार फक्त) |
| १३ | सोलापूर | ११५८.३०० | ० | ११५८.३०० | (अक्षरी रुपये अकरा लक्ष अठावन्न हजार तीनशे फक्त) |
| १४ | कोल्हापूर | ३१३६.८०० | ० | ३१३६.८०० | (अक्षरी रुपये एकत्तीस लक्ष छत्तीस हजार आठशे फक्त) |
| १५ | औरंगाबाद | २२०५.२०० | ० | २२०५.२०० | (अक्षरी रुपये बावीस लक्ष पाच हजार दोनशे फक्त) |
| १६ | जालना | १७१७.३०० | ० | १७१७.३०० | (अक्षरी रुपये सतरा लक्ष सतरा हजार तीनशे फक्त) |
| १७ | परभणी | ६५२.६०० | ० | ६५२.६०० | (अक्षरी रुपये सहा लक्ष बावन्न हजार सहाशे फक्त) |
| १८ | हिंगोली | ३४२.१०० | ० | ३४२.१०० | (अक्षरी रुपये तीन लक्ष, बेचाळीस हजार एकशे फक्त) |
| १९ | बीड | १०६६.००० | ० | १०६६.००० | (अक्षरी रुपये दहा लक्ष सहासष्ट हजार फक्त) |
| २० | नांदेड | १४५१.१०० | ० | १४५१.१०० | (अक्षरी रुपये चैादा लक्ष एकावन्न हजार एकशे फक्त) |
| २१ | उस्मानाबाद | ५००.००० | ० | ५००.००० | (अक्षरी रुपये पाच लक्ष फक्त) |
| २२ | लातूर | ९९६.२०० | ० | ९९६.२०० | (अक्षरी रुपये नऊ लक्ष शहाण्णव हजार दोनशे फक्त) |
| २३ | बुलढाणा | १३१८.००० | ० | १३१८.००० | (अक्षरी रुपये तेरा लक्ष अठरा हजार फक्त) |
| २४ | अकोला | ९१८.८०० | ० | ९१८.८०० | (अक्षरी रुपये नऊ लक्ष अठरा हजार आठशे फक्त) |
| २५ | वाशिम | ४३०.८०० | ० | ४३०.८०० | (अक्षरी रुपये चार लक्ष तीस हजार आठशे फक्त) |
| २६ | अमरावती | २२९३.९०० | ० | २२९३.९०० | (अक्षरी रुपये बावीस लक्ष त्र्याण्णव हजार नऊशे फक्त) |
| २७ | यवतमाळ | १७६१.६०० | ० | १७६१.६०० | (अक्षरी रुपये सतरा लक्ष एकसष्ट हजार सहाशे फक्त) |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २८ | वर्धा | १५८४.२०० | ० | १५८४.२०० | (अक्षरी रुपये पंधरा लक्ष चौ-याऐंशी हजार दोनशे फक्त) |
| २९ | नागपूर | २९३९.८०० | ० | २९३९.८०० | (अक्षरी रुपये एकोणतीस लक्ष एकोणचाळीस हजार आठशे फक्त) |
| ३० | भंडारा | ६९७.००० | ० | ६९७.००० | (अक्षरी रुपये सहा लक्ष सत्याण्णव हजार फक्त) |
| ३१ | गोंदिया | ५००.००० | ० | ५००.००० | (अक्षरी रुपये पाच लक्ष फक्त) |
| ३२ | चंद्रपूर | २९४८.००० | ० | २९४८.००० | (अक्षरी रुपये एकोणतीस लक्ष अठठेचाळीस हजार फक्त) |
| ३३ | गडचिरोली | १५८४.३०० | ० | १५८४.२०० | (अक्षरी रुपये पंधरा लक्ष चौ-याऐंशी हजार दोनशे फक्त) |
| **एकूण** | | **६३२६६.०००** | **०** | **६३२६६.०००** | **(अक्षरी रुपये सहा कोटी बत्तीस लक्ष सहासष्ट हजार फक्त)** |

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.09.23 12:01:19 +05'30'

(महेश भ. सावंत)

उप सचिव, महाराष्ट्र शासन